**२०११-१२ करिता कापूस, सोयाबीन व धान पिक उत्पादक शेतकऱ्यांना अर्थसहाय्य करण्यास प्रशासकिय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

शासन निर्णय क्रमांक-कापूस-२०११/प्र. क्र.१७८/१-स

शिबीर कार्यालय, नागपूर, दिनांक - २३/१२/२०११

**प्रस्तावनाः**

चालू वर्षी मोसमी पावसाचे उशिरा आगमन होऊन कापूस, सोयाबीन व धान या खरीप पिकांची उशिरा पेरणी झाली होती. तसेच संपूर्ण पावसाळ्यात पावसाचे झालेले अनियमित वितरण आणि राज्याच्या काही भागांमध्ये पिकांच्या संवेदनशील वाढीच्या काळामध्ये काही कालावधींकरिता अवर्षणाची परिस्थिती निर्माण झाल्यामुळे सदर पिकांच्या उत्पादकतेमध्ये घट आली आहे. त्याचप्रमाणे, शेतीतील पीक उत्पादनाशी निगडीत कृषी निविष्ठांच्या भावामध्ये वाढ झाल्याने राज्यातील शेतकऱ्यांचा सदर पिकांचा उत्पादन खर्च वाढल्यामुळे आणि सद्य:स्थितीत सदर पिकांना मिळणारे कमी बाजारभाव लक्षात घेता, शेतकऱ्यांच्या हाती येणारे उत्पन्न असमाधानकारक आहे.

सदर नैसर्गिक आपत्तीमुळे कापूस, सोयाबीन व धान उत्पादक शेतक-यांच्या निव्वळ उत्पन्नात घट झाल्यामुळे बाधित शेतक-यांना अर्थसहाय्य देण्याचा प्रस्ताव शासन विचाराधीन होता. त्यानुषंगाने शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे:

**शासन निर्णय :-**

१. राज्यातील कापूस, सोयाबीन व धान उत्पादक शेतकऱ्यांना अर्थसहाय्य देण्याकरिता या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्यातील कापूस उत्पादक शेतकऱ्यांना ७/१२ उताऱ्यावरील प्रत्यक्ष पिक पेरणी नोंदीच्या आधारे सरसकट कमाल २ हेक्टर मर्यादेपर्यंत प्रती हेक्टरी रु.४,०००/- (रूपये चार हजार फक्त) याप्रमाणे मदत अदा करण्यात यावी.

३. सोयाबीन व धान उत्पादक शेतकऱ्यांना अर्थसहाय्य देण्यासाठी खरीप हंगाम सन २०११ मध्ये ज्या तालुक्यातील सोयाबीन व धान या पीकांच्या उत्पादकतेत किमान २५ टक्के किंवा त्यापेक्षा जास्त घट आली आहे त्या तालुक्यातील शेतकऱ्यांना २ हेक्टरच्या मर्यादेपर्यंत प्रती हेक्टरी रु.२,०००/- याप्रमाणे मदत देण्यात यावी.

४. उपरोक्त मदतीकरीता कापूस, सोयाबीन व धान या पिकाखालील क्षेत्र मदतीस पात्र राहील. सदर तिनही पिकांसाठी प्रति पिकाकरिता मदतीचे प्रमाण कमाल २ हेक्टर क्षेत्रापर्यंत देय राहिल. तथापि, मदतीचे एकूण किमान प्रमाण रूपये ५००/- इतके राहील.

५. ज्याप्रमाणे पैसेवारीसाठी तालुक्यातील मागील १० वर्षातील उत्कृष्ट तीन वर्षांची सरासरी उत्पादकता प्रमाणभूत उत्पादकता म्हणून ग्राह्य धरण्यात येते, त्याचप्रमाणे सोयाबीन व धान पीकाच्या तालुक्याच्या सरासरी उत्पादकतेतील घट निश्चित करण्यासाठी सदर प्रमाणभूत उत्पादकता ग्राह्य धरण्यात यावी. चालू वर्षीच्या

सोयाबीन व धान या पीकांच्या प्रत्यक्ष पीक कापणी प्रयोगांमधील उत्पादकतेच्या आकडेवारीच्या आधारे सदर पीकांच्या उत्पादकतेमध्ये २५ टक्के व त्याहून अधिक घट असणाऱ्या तालुक्यांची यादी कृषी विभागाने अंतिम करावी. सदर प्रमाणित यादी कृषी विभागाने महसूल विभागास हस्तांतरीत करावी. तद्नंतर महसूल विभागाकडून सदर तालुक्यातील सोयाबीन व धान उत्पादक खातेदारांना चालू वर्षाच्या ७/१२ उताऱ्यावरील पीक नोंदीच्या आधारे मदत अदा करावी.

६. कापूस, सोयाबीन व धान उत्पादक शेतकऱ्यांना उपरोक्त मदतीचे प्रत्यक्ष वाटप महसूल विभागामार्फत करण्यात यावे आणि त्यासाठी आवश्यक निधी अर्थसंकल्पीत करुन आवश्यकतेप्रमाणे जिल्हाधिकारी यांना हस्तांतरित करावा. मदतीचे वाटप करण्यासाठी जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात यावी. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे समितीचे उपाध्यक्ष राहतील. तसेच, जिल्हा अधीक्षक, कृषी अधिकारी व जिल्हा उपनिबंधक (सहकारी संस्था), हे या समितीचे सदस्य राहतील.

उपरोक्त समितीने या मदत वाटपाचे समन्वयन करावे. निधीचे वाटप शेतकऱ्यांच्या बँक खात्यावरच होईल, याची समितीने दक्षता घ्यावी.

७. निधी वाटपासाठी प्रशासकीय खर्चाकरिता एकूण निधीच्या ०.५ टक्के निधी देय राहील.

८. महसूल (मदत व पुनर्वसन) विभागाने उपरोक्त मदतीकरिता लागणारा अंदाजित रुपये २००० कोटी निधी पुढील लेखशिर्षाखाली अर्थसंकल्पीत करुन घ्यावा व सदर निधी जिल्हाधिकारी यांना कापूस, सोयाबीन व धान उत्पादक पात्र शेतकऱ्यांना प्रत्यक्ष मदतीचे वाटप करण्याकरिता हस्तांतरित करावा.

मागणी क्रमांक - डी-३
२२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य
०१ अवर्षण
१०१ अनुग्रह सहाय्य
०२ पूर, चक्रीवादळे इत्यादी
(००) (०२) इतर बाबी
३१-सहाय्यक अनुदान (२२४५ १४९२)

९. सदरहू शासन निर्णय महाराष्ट् शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक **२०१११२३१०६०००५१२५००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**(डॉ. सुधीर कुमार गोयल)**
**शासनाचे प्रधान सचिव**

**प्रत:**

१.मा.राज्यपाल यांचे सचिव
२.मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३.मा.उपमुख्यमंत्री (नियोजन व वित्त) यांचे सचिव
४.मा.मंत्री (कृषी व पणन) यांचे खाजगी सचिव

५.मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव
६. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
७.मा.राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव
८.मा.राज्यमंत्री (पणन,महसूल, मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव
९.मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव
१०.मा.अप्पर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन)
११.मा.प्रधान सचिव (कृषि व पणन) / प्रधान सचिव (वित्त)
१२.मा.प्रधान सचिव (महसूल) / प्रधान सचिव (नियोजन)
१३.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुख
१४.महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र मुंबई/नागपूर (प्रत्येकी ३ प्रती)
१५ महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा ) महाराष्ट्र मुंबई/नागपूर (प्रत्येकी ३ प्रती)
१६. संचालक लेखा व कोषागरे, संगणक शाखा, मुंबई
१७.महासंचालक माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (२ प्रती)
१८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१९. अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे, मुंबई
२०.व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ,मुंबई
२१.सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे
२२.सर्व विभागीय आयुक्त
२३. कृषी आयुक्त, महाराष्ट् राज्य, पुणे.
२४.सर्व जिल्हाधिकारी
२५.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२६.आयुक्त, कृषि महाराष्ट्र राज्य पुणे
२७.पणन संचालक, महाराष्ट्र राज्य पुणे
२८.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे
२९.सर्व विभागीय कषि सहसंचालक
३०.सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
३१.सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
३२.सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
३३.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई (५ प्रति)
३४.वित्त विभाग (व्यय९/अर्थसंकल्प ३, अर्थसंकल्प६/अर्थापाय कक्ष), मंत्रालय मुंबई
३५.सर्व कार्यासने, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मुंबई
३६.निवडनस्ती कार्यासन १-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.